**पोलीस पाटील,**
नेमणूका,आरक्षण,अपील,मानधन,
इत्यादींबाबत

महाराष्ट्र शासन,

गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक : बीव्हीपी- ०२९९ / सीआर-५६ / पोल-८,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२, दिनांक : ७ सप्टेंबर, १९९९.

वाचा :- १) परिपत्रक क्रमांक बीव्हीपी-१८६४/८-५८८४-सहा ,दिनांक १७.६.९५,
२) परिपत्रक क्रमांक बीव्हीपी-१२६७/५३०३७/रोमन-६, दिनांक २.८.६९,
३) परिपत्रक क्रमांक बीव्हीपी-०१७८/आठ-पी, दिनांक २४.४.७८,
४) परिपत्रक क्रमांक बीव्हीपी-२४७८/५/पोल-८, दिनांक १०.५.८३,
५) परिपत्रक क्रमांक बीव्हीपी-०१८३/१४६६७/पोल-८, दिनांक ४.२.८४,
६) परिपत्रक क्रमांक बीव्हीपी-०१८४/पोल-८, दिनांक ९.७.८४,
७) परिपत्रक क्रमांक बीव्हीपी-०१८५/पोल-८, दिनांक १.१.८७
८) परिपत्रक क्रमांक- बीव्हीपी-१०८०/३/पोल-८, दिनांक २.११.९४,
९) शासन निर्णय , गृ.वि.,क्रमांक -बीव्हींपी-१२९२/४/पोल-८, दिनांक २५.९.९५,
१०) परिपत्रक क्रमांक- बीव्हीपी-०१८५/पोल-८, दिनांक १.३.८५,
११) शासन निर्णय, गृ.वि., क्रमांक- बीव्हीपी-३४६३/सहा, दिनांक २०.५.६३,
१२) शासन निर्णय, गृ.वि., क्रमांक-बीव्हीपी-३४६३/सहा, दिनांक २१.११.६३,
१३) शासन निर्णय, गृ.वि., क्रमांक -बीव्हीपी-३४६३/सहा,दिनांक १०.१.६४.
१४) शासन निर्णय, गृ.वि., क्रमांक -बीव्हीपी-४३६३/सहा,दिनांक २९.५.६४,
१५) शासन निर्णय,गृ.वि.,क्रमांक-बीव्हीपी-३४६४/सहा,दिनांक २.७.६४,
१६) शासन शुध्दी पत्रक,गृ.वि.,क्रमांक बीव्हीपी-३४६४/सहा, दिनांक ७.७.६४,
१७) शासन निर्णय,गृ.वि. क्रमांक बीव्हीपी-०१७७/५/आठ-पी, दिनांक १४.२.७८,
१८) शासन निर्णय,गृ.वि.,क्रमांक बीव्हीपी-१७७१/१/आठ-पी,दिनांक १६.४.८७,
१९) शासन निर्णय,गृ.वि.,क्रमांक बीव्हीपी-०१८३/१४६६७/पोल-८,दिनांक ४.१.९०,
२०) शासन निर्णय,गृ.वि.क्रमांक बीव्हीपी-१५९१/५८/भाग-३/पोल-८,दिनाक ४.८.९७.

**प्रस्तावना** :- महाराष्ट्र ग्राम पोलीस अधिनियम १९६७ व महाराष्ट्र ग्राम पोलीस (सेवा प्रवेश, वेतन भत्ते,आणि सेवेच्या इतर शर्ती ) आदेश १९६८ मधील तरतूदीनुसार पोलीस पाटलांच्या नेमणूक आरक्षण, अपील व मानधन इत्यादींबाबत उपरोक्त संदर्भात वर नमूद केल्याप्रमाणेआदेश निर्गमि केलेले आहेत. सदर आदेशाचे एकत्रिकरण करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन हो ... खालीलप्रमाणे आदेशांचे एकत्रिकरण केलेले आहे.

GR 200207051333370000-0200

निर्णय :- **पोलीस पाटलांच्या नेमणूकीचे अधिकार व नेमणूकीबाबत शैक्षणिक पात्रता वयाच्या अटी व अपील**

महाराष्ट्र ग्राम पोलीस अधिनियम १९६७ च्या कलम-३ अन्वये पोलीस पाटलांच्या नेमणूका करण्याचे अधिकार उप विभागीय दंडाधिकारी/उप विभागीय अधिकारी यांना प्रदान करण्यात आलेले आहेत. उपविभागीय दंडाधिकारी/ अधिकरी हे महाराष्ट्र ग्राम पोलीस (सेवा प्रवेश, वेतन, भत्ते आणि सेवेच्या इतर शर्ती ) आदेश, १९६८ मधील तरतूदीनुसार करतात.

मागासवर्गीयांसाठी शासकीय सेवेमध्ये काही ठराविक प्रमाणात पदांचे आरक्षण करण्यासंबंधीच्या शासनाच्या धोरणास अनुलक्षून, पोलीस पाटलांची काही पदे त्याप्रमाणात आरक्षित ठेवण्यात यावीत व प्रत्येक जिल्हयामध्ये पोलीस पाटलांची पदे भरताना व आरक्षित ठेवलेल्या पदांवर केवळ मागास वर्गीयांचीच नियुक्ती प्राथम्याने करण्यात यावी अशा आशयाचे आदेश उपरोक्त संदर्भामधील अ.क्र.(३) व (४) अन्वये निर्गमित केलेले आहेत. महाराष्ट्र ग्राम पोलीस ( सेवा भरती, वेतन, भत्ते आणि सेवेच्या इतर शर्ती ) नियम-३(अ) अन्वये पोलीस पाटील पदासाठी सर्वसाधारण उमेदवारांसाठी वयोमर्यादा २५ ते ४५ अशी विहित केली आहे. त्याचप्रमाणे नियम-३(ब) अन्वये शैक्षणिक पात्रता ही सहावी पास निश्चित केली आहे. परंतु मागासलेल्या जमातीच्या विभागात विहित शैक्षणिक पात्रता असलेला उमेदवार उपलब्ध होत नसल्यास, शैक्षणिक पात्रतेबाबतची विहित मर्यादा शिथिल करुन , ज्याने प्राथमिक शाळेची चवथी इयत्ता उत्तीर्ण केली असेल असा उमेदवार, जर तो इतर सर्व दृष्टया योग्य असेल तर, पोलीस पाटलांच्या पदावरील नेमणूकीस पात्र समजण्यात यावा.तसेच उमेदवार हा स्थानिक रहिवाशी असला पाहिजे व त्याचे नावे जमीन असावी.

इतर विभागामध्ये जर मागासलेल्या जाती/जमातीतील उमेदवारांनी या पदासाठी अर्ज केला नाही, अथवा त्यांच्यामध्ये योग्य उमेंदवार आढळून आला नाही तर, महाराष्ट्र ग्राम पोलीस (सेवा भरती, वेतन, भत्ते आणि इतर सेवाशर्ती ) आदेश १९६८ मधील नियम-३ मधील अटी पूर्ण करीत असेल अशा मागासेतर जातीमधील योग्य उमेदवारांची पोलीस पाटील म्हणून नियुक्ती करण्यात यावी. ही नियुक्ती केवळ मागासलेल्या जाती/जमातींपैकी योग्य उमेदवार उपलब्ध होईपर्यन्तची कामचलाऊ व्यवस्था म्हणून न धरता, ती सर्वसाधारणपणे पांच वर्षाच्या मुदतीसाठी केलेली नियमित नियुक्ती असावी.

वाडीचे गांवात रुपांतर झाल्यास अथवा महसुली गांव निर्माण झाल्यास तेथील पोलीस पाटलाचे पद निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करु नये. तथापि सदर गांवात नियमानुसार पोलीस पाटलाची नेमणूक करुन संबंधित जिल्हा पोलीस अधिक्षक यांना कळविण्यांत यावे. त्यानुसार जिल्हा पोलीस अधिक्षक यांनी अर्थसंकल्पीय तरतूद करावी.

ज्या गावामध्ये १००% आदिवासी लोकसंख्या आहे तेथील पोलीस पाटील पद भरताना अनुसूचित जमातीच्या व्यतिरिक्त इतर संवर्गातील उमेदवार उपलब्ध नसतील तर पोलीस पाटलांची पदे शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीसीसी १०९१/२५५१/क/१६-ब, दिनांक २७.३.९१ मधील आदेशानुसार ३ भरती वर्ष रिक्त न ठेवता तसेच सदर पदे व्यपगत न करता त्याच

GR 200207051333370001-0200

वर्षी (भरतीच्या पहिल्या वर्षी) उपलब्ध असलेल्या अनुसचित जमाती उमेदवारांमधून भरण्यात यावित. विशिष्ट संवर्गातील राखून ठेवलेल्या पोलीस पाटलाचे पदावर १०० % आदिवासी लोकसंख्या असलेल्या गावामध्य ज्यावेळी संबंधित संवर्गातील उमेदवार उपलब्ध होतील त्यावेळी अशा उमेदवारांची नेमणूक आदिवासी उमेदवाराची सेवा समाप्त करुन करण्यात यावी. यामुळे राखीव जागांबाबतच्या धोरणास बाधा येणार नाही.

महाराष्ट्र ग्राम पोलीस अधिनियमाच्या कलम-३ अन्वये पोलीस पाटलांच्या नेमणूका करण्याचे अधिकार उपविभागीय दंडाधिकारी यांना प्रदान करण्यात आलेले आहेत व त्यांनी केलेल्या नेमणूकीविरुध्द अन्य उमेदवारांनी दाखल केलेल्या अपीलांच्या अनुषंगाने शासनाने अथवा विभागीय आयुक्तांनी, उपविभागीय दंडाधिका-यांच्या नियुक्ती आदेशांची फेरतपासणी करण्याची तरतूद या अधिनियमात नाही. या अधिनियमांमध्ये नियुक्त्यांच्या विरुध्द अपील करण्याची तरतूद नसली तरीही, उप विभागीय दंडाधिका-यांनी केलेली एखादी पोलीस पाटलांची नियुक्ती अन्यायकारक आहे, अशा आशयांची अपीले वारंवार प्राप्त होतच असतात. म्हणून सदर अधिनियमांमध्ये पोलीस पाटलांच्या नेमणूकीबाबतच्या आदेशांची फेरतपासणी आणि पुनर्विलोकनाची तरतूद करण्यांच्या प्रस्तावावर विधी व न्याय विभागाने असा सल्ला दिला की, नियुक्त्यांविरुध्द अपील शक्तींची तरतूद करणे हे भारतीय घटनेचा अनुच्छेद ३११ (२) शी विसंगत आहे. व अशी असंविधानिक तरतूद करता येणार नाही. तथापि, उप विभागीय दंडाधिकारी हे या नियुक्त्यांच्या बाबतीत प्रशासकीय ( Administrative ) आणि न्यायीकवत (Quasi Judicial ) अशी दुहेरी कर्तव्ये पार पाडत असल्यामुळे, त्यांनी जर एखादी नियुक्ती विहित नियमांचे अथवा या संदर्भात शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशांचे पालन न करता केली असेल, वा अन्य कोणत्याही अन्यायकारक रितीने केली असेल, तर ती चुकीची वा अन्यायकारक नियुक्ती रद्द करण्यास ते स्वत: सक्षम आहेत. परंतु त्याचप्रमाणे अगोदर काढलेले चुकीचे वा अन्यायकारक आदेश रद्द करण्यापूर्वी उप विभागीय दंडाधिका-यांनी संबंधित उमेदवाराला, त्याची नियुक्ती रद्द कां करु नये याची कारणे दाखवा नोटीस देणे व सदर नोटीशीला त्याने दिलेले उत्तर विचारात घेणे आवश्यक आहे.

महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ च्या नियम-५ अन्वये पोलीस पाटील हा राजकारणात किंवा विधानसभेच्या कोणत्याही निवडणुकीत अथवा स्थानिक निवडणुकीत भाग घेऊ शकणार नाही.

## २. पोलीस पाटलांचे मानधन इत्यादींबाबत

पोलीस पाटलांचे मानधन वाढविण्याबाबत शासनाने वेळोवेळी शासन निर्णय निर्गमित केलेले आहेत. याबाबत अनुक्रमांक १७ येथील शासन निर्णयानुसार राज्यातील पोलीस पाटलांना दिनांक १ जून,९७ पासून दरमहा रु.५००/- मानधन व नक्षलग्रस्त भागात नक्षलवादी विरोधी कारवायात पोलीस पाटलाचा मृत्यू झाल्यास त्याच्या वारसाला रु. १,००,०००/- ( रुपये एक लाख फक्त ) एवढे सानुग्रह अनुदान देण्यात यावे. त्याचप्रमाणे नक्षलवादी भागात नक्षलवादी विरोधी कारवाई करीत असताना मृत पावलेल्या पोलीस पाटलाच्या कुटुंबातील एका व्यक्तीस शक्यतो अनुकंपा तत्वाप्रमाणे

GR-200207051333370000-0200

पोलीस पाटील म्हणून नियुक्तीसाठी अग्रक्रम देण्याबाबत दिनांक ४.८.९७ रोजी निर्गमित केलेला शासन निर्णय अद्यापही लागू आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( मा.पुं.लोखंडे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व पोलीस आयुक्त (बृहन्मुंबई वगळून)
सर्व जिल्हादंडाधिकारी
सर्व पालीस अधिक्षक
सर्व उप विभागीय दंडाधिकारी/अधिकारी (जिल्हा दंडाधिका-यांमार्फत )
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा),महाराष्ट्र,मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा),महाराष्ट्र, नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे,महाराष्ट्र राज्य,मुंबई
सर्व कोषागार अधिकारी,
वित्त विभाग (व्यय-७)
गृह विभाग (बीयुडी-१)
निवड नस्ती.

GR-200207051333370000-0200